# २०० वर्षांपूर्वीच्या लोणीकंद खेड्याचे शब्दचित्र










**आपले छंद या दिवाळी वार्षिकांसाठी बारा बलुतेदारांच्या थीमवर आधारित लेख लिहिताना ...कै. व्यंकटेश माडगुळकर माझे आवडते लेखक. त्यांच्या २८ ऑगस्ट या पुण्यस्मरणाच्या निमित्ताने हे लेखन त्यांना समर्पित आहे.**

काही काळापुर्वी माझ्या हाती 'चित्रे आणि चरित्रे' या नावाचे कै. व्यंकटेश माडगुळकरांचे पुस्तक हाती आले. (उत्कर्ष प्रकाशन पुणे. पहिली आवृत्ती - जानेवारी १८८३, मूल्य ३० रुपये.) त्यातील 'नवे गाव' शीर्षकाचा एक लेख 'साप्ताहिक तेजस्वी'मधे सन १९७०च्या सुमाराला प्रसिद्ध झाला होता. त्याच्या शेवटी त्यांनी टिप्पणी केली होती. *'... खेडी बदलू लागली, देश स्वतंत्र झाला आणि काळाने विलक्षण वेग घेतला. खेड्याचा कायापालट झाला असे आपण म्हणतो. हा कायापालट कसा झाला आहे, काय झाला आहे. ह्याचा नीट तपास घ्यायचा तर कोट्साहेबाने जसे कुठलेतरी एक लोणी गाव घेऊन त्यांचा सांप्रत वृतांत लिहिला, तशी महाराष्ट्रातील दहा-पाच खेडी घेऊन त्यांचा लिहिला पाहिजे. लोकांना भेटून, बोलून, प्रत्यक्ष स्थिती डोळ्यांनी पाहून आजच्या खेड्याचे चित्र रेखाटले पाहिजे....'*

**खालील लेखकांनी आपापल्या परीने या विषयावर लेखन कार्य केले आहे. त्याचा परिचय करून देताना बारा बलुतेदारांची व त्या काळातील गाव जीवनातील अनेक रंजक पैलूंवर ओळख करुन देण्यासाठी लेख सादर केला आहे....**कै. व्यंकटेश माडगुळकांनी एका बाजूला लोणीकंद या प्रातिनिधिक खेड्यातील सर्जन कोट्साहेबाच्या सन १८२० मधील वृतांतामधील काही उतारे देऊन त्यांनी त्यांच्या बालपणातील (सन १९३०-४०) पाहिलेल्या अनुभवलेल्या खेड्यातील जनजीवनाचा उल्लेख करून तोपर्यंतच्या १००-११० वर्षांत फारसा फरक पडला नसल्याची नोंद केली आहे. शिवाय ते म्हणतात की सुप्रसिद्ध मुंबई विश्वविद्यालयातील समाज शास्त्र विषयाला वाहिलेले डॉ. घुर्ये गोविंद सदाशिव ह्यांनी कोट्स नंतर १२५ वर्षांनी 'लोणीकंद – देन अँड नाऊ' असा वृतांत प्रसिद्ध केला होता. त्यात त्यावेळी कोट्स साहेबाच्या कथनातील काही गोष्टीत काय व कसा फरक झाला होता यांची नोंद केली होती. डॉ. घुर्ये यांच्या नंतर हे काम विंग कमांडरनी हाती घेतले होते. असो...

**कै. माडगुळकर** आपल्या 'नवे गाव' लेखात म्हणतात, 'ह्या वृतांतात सर्जन कोट्साहेबांनी गावची लोकसंख्या, गावचा कारभार, जाती-जमाती, आर्थिक स्थिती, व्यापार उदीम, शेती, लोकांची राहणी, कपडे, जेवण खाण, ह्या संबंधी सर्व लहानसान तपशील दिले आहेत. बाराबलुतेदारांची बरीच कामे कोट्साहेबांनी दिली आहेत त्यापैकी काही विशेष निवडक अशी मी घेतली आहेत.

'‘**सुतार**, लग्न प्रसंगी नवरानवरीला बसवून आंघोळ घालण्यासाठी चौरंग पुरवतो. तंबू ठोकण्यासाठी व घोडे बांधण्यासाठी खुंट्या पुरवतो.’

‘**लोहार**, बगाडाचे काम करतो. हे काम म्हणजे भैरोबा व हनुमानाच्या मुर्तीसमोर घुमणाऱ्या भक्तांच्या पाठीच्या कातडीतून लोखंडी आकडा घालणे होय.’

‘**धोबी**, लग्नामधे, मिरवणुकीच्या वेळी नवरानवरींसमोर पायघड्या अंथरतो. ’

‘**न्हावी**, सुटीच्या दिवशी पाटील आणि कुलकर्णी ह्यांचे मालिश आणि चंपी करतो. लग्नाच्या वेळी वाजंत्री वाजवतो. पेरणीच्या दिवसात बैलाच्या शेपट्या कातरतो. त्याबद्दल त्याला धान्य मिळते.’

‘**सोनार**, कर भरले जातात तेंव्हा नाणी चांगली आहेत, का नाहीत हे पहातो. त्याच्याकडून सोन्याचांदीचे काम करवून घेतले जाते. तेव्हा त्याला दोन पैशांपासून एक रुपयांपर्यंत मजुरी मिळते.’

‘**मांग**, तरुण बैलांचे वृषण बडवतो. देहांताची शिक्षा झालेल्यांना मारण्याचे काम करतो.’

‘**महाराचे**, काम म्हणजे गावच्या सीमेवर व एकूण गावाच्या कारभारामध्ये आक्रमण न होऊ देणे. त्यांना सीमांचे अगदी बारीक ज्ञान असते. सीमेच्या भांडणात त्याची जबानी निर्णयात्मक समजली जाते. वेशीचे दरवाजे उघडण्याचे व बंद करण्याचे काम त्याच्याकडे असते. ’

‘**रामोशी**, जमातीबद्दल सांगताना कोट्स लिहितात, त्यांचे डोळे व कान जनावरांप्रमाणे तीक्ष्ण असतात. माणसाचा व जनावरांचा माग ते इतका बरोबर काढतात, की आपला विश्वास बसणार नाही. एकदा शब्द दिल्यावर ते तो पाळतात.’

‘**खाटिक** मुसलनामान , उर्मट व दांडगे वाटतात. त्यांची अतिद्वेषार्ह असहिष्णुता आणि हटवादी तत्वामुळे ते त्यांच्या मुर्तीपूजक शेजाऱ्यांच्या धार्मिक विधींचा तिरस्कार व निर्भत्सना करतात. गावामध्ये मुसलमानांची एक मशिद आहे. तिथे ते कुठल्याही अडथळ्याशिवाय सर्व धार्मिक विधि पार पाडतात.’

‘**गुलामांची** गावात, आठ कुटुंबे असून माणसांची संख्या अठरा आहे. त्यांना शंभर रुपयांपासून पाचशे रुपयांपर्यंत विकतात. विशेषतः(दिसायला) चांगल्या नसणाऱ्या मुलींना ब्राह्मण लोक घरातील कामे करण्यासाठी विकत घेतात.

’कै. माडगुळकर आपल्या अनुभवाची त्यात भर घालताना म्हणतात, 'जवळजवळ लोणी एवढीच लोकसंख्या आणि आकार असलेल्या महाराष्ट्रातील खेड्यात माझा जन्म झाला. कोट्स ह्यांनी लिहिलेला सर्व वृतांत वाचल्यावर माझ्या असे लक्षात आले की

**एकोणिसशे सदतीस साली** मी जे खेडे पाहिले आहे, ते विशेष बदललेले नव्हते.त्यांच्या आठवणी प्रमाणे त्यांच्या गावाला दोन पाटील होते. कुलकर्णी होता. शाळा मराठी चवथ्या इयत्तेपर्यंत होती. मास्तर एकच होते. शाळेत फक्त एकच ब्राह्मणाची मुलगी होती. गावात आठ ब्राह्मणाची घरे होती. दोन मोमिनाची होती. एक मराठ्याचे होते. बाकी सर्व येलमार होते. त्यांची जात फक्त आठ गावात आहे असे ते सांगत. सर्वच यलमार गळ्यात लिंग घालत नसत. रामोशी, महार, मांग,

**होलार** यांची संख्या बरीच होती. सुताराचे व गवंड्याचे काम एक महारच करीत असे. शिवाय एक घर परटाचे होते. दोन न्हाव्यांची होती. एक सोनाराचे होते. एक

**कासारा**चे होते. आमच्या गावाला वाणी नव्हता, पण शेजारच्या गावातील वाण्याने काही वर्षांनी गावात दुकान टाकले. शिंपी नव्हताच.’गावात वाण्याचे दुकान आले. हा

**वाणी** पैशाबदली काहीही घेई. कोणतेही धान्य, वैरणीची पेंडी, बाभळीचा डिंक, करंजीच्या बिया, असे काहीही त्याला घालून गूळ, तेल, मीठ, जिरे, मिरे, असा माल विकत घेता येत असे.माडगुळकारांच्या लहानपणी बलुत्याची पद्धत चालू होती. न्हावी हजामत करी. आणि ताजी भाकरी घेऊन जाई. परीट कपडे धूत असे. होलार पायताण सांधण्याचे काम करी. महार जळणाचे लाकूड फोडून, त्या बदली भाकरी-कालवण घेऊन जाई.

**रामोशी** रोज संध्याकाळी भाकरी मागे आणि त्या बदली चोरीस गेलेल्या वस्तूंचा तपास लावून देई. ज्याच्याकडे बागाईत जमिनी असत त्याच्याकडे जाऊन **बलुतेदार मंडळी** रताळे, गाजरे, मिरची, वांगी, कांदे असले 'माळवे' खाण्यासाठी मागून आणत. सुगी संपल्यावर, खळ्याच्या वेळी ह्या सगळ्यांना धान्याची पेंढी मिळे.शेतीची जमीन, ती कसण्याची पद्धती, अवजारे, शेतकऱ्याजवळ असणारी जनावरे ह्याविषयी ही बारीकसारीक माहिती देऊन साहेबांच्या मजकुरात त्याकाळी असलेल्या धान्याच्या किंमतीही दिल्या आहेत. गहू रुपयाला बारा शेर, हरभरा रुपयाला सोळा शेर, ज्वारी रुपयास अठरा शेर (स्वस्त झाली तर पंचवीस शेर), नाचणी रुपयास तीस शेर. तांदूळ रुपयास दहा शेर.धान्य दळण्यासाठी, भरडण्यासाठी दगडी जाती होती.

पाण्यासाठी मातीचे रांजण होते. पीठ मळण्यासाठी लाकडी काथवटी म्हणजे पराती होत्या. ( ह्या लाकडी परातीची किंमत कोट्सनी दहा पैसे दिली आहे.) उखळ होते. मुसळ होते. मडकी होती, त्यांच्या उतरंडीही घातल्या जात होत्या.

धान्य ठेवण्यासाठी टोपल्या, कणग्या होत्या. लाकडाच्या ठाणवईवर ठेवलेले लोखंडी दिवे होते.

गावोगावी जत्रा आणि होळी, दसरा, दिवाळी आणि पोळा (आमच्याकडे बेंदूर) हे सण शंभर वर्षापुर्वी साजरे होत, तशाच पद्धतीने साजरे होताना मी पाहिले आहेत. होळीसाठी मिळेल त्या ठिकाणाहून लाकडे चोरणे, होळीला पोळी देण्याचा मान पाटलांचा असणे, नंतर रात्रभर तमाशा होणे, सोंगे निघणे हे सगळे होत होते. धुळवडीला चिखलफेक होत होती.

कुस्त्या होत होत्या.दसऱ्याला नवीन कपडे घालून आणि फेट्यात नव्या धान्याचे तुरे खोवून वाजत गाजत सीमोल्लंघन होई. शस्त्र पुजा, होत होती. आपट्याच्या झाडाची पुजा होत होती. सोने लुटले जात होते. फक्त कोट्सनी लिहिल्यापैकी मेंढ्याचा बळी मात्र नव्हता.पोळ्याचा सणही दणक्यात होत होता. बैलांची शिंगे बेगडाने रंगवून त्यांच्या टोकाला गोंडे बांधले जात. गळ्यात फुलांच्या माळा घातल्या जात. बैलांना पक्कांन्ने चारुन त्यांची पूजा होई. मालक त्याच्या पाया पडत. संध्याकाळी सगळे बैल मिरवणुकीने हनुमानाच्या देवळाकडे निघत. पाटलांचे बैल सर्वात पुढे असत. दुसऱ्या दिवशी गाव शिकारीला जाई., कडक उन्हाच्या वेळी शिकारी रानात दूरदूर विखरत. ससे, हरीण, डुक्कर असे जनावर उठले की त्याचा ताणपट्टा काढत. ते धाऊन थकल्यावर त्याला सोट्याने मारत. ही शिकार वाजत गाजत गावात येई. शिकारीचे मुंडके वेशीत पुरले जाई. शेपुट वेशीतल्या झाडाला टांगले जाई आणि मासांतील वाटा घरोघर पोचता होई.शेतकऱ्याला होणाऱ्या रोगराईबद्दल ही कोट्सनी लिहिले आहे. त्यात नारु आहे. गावचा न्हावी शस्त्रवैद्यकी करत असे. पायांना झालेली कुरुपे कापून घेणे, रुतलेला काटा काढून घेणे, ही कामे त्याच्याकडून केली जात. बायका अंधाऱ्या खिडकी नसलेल्या जागेत बाळंत होत. आतील, नीट हवा नसलेल्या जागी दिवा जळत असे. शेगड्या धगधगत असत. 'बाळ-बाळंतीण सुखरूप' हे नेहमीच ऐकायला मिळत नसे.

**लोणीकंद** गावची एकूण लागवडी खालील जमीन दोन हजार आठशे एक्क्यांशी एकर आणि तीस सारवळ्या असून जमीन महसूल एक हजार तीनशे एक्कावन्न रुपये आठ आणे आहे. एकूण घरे एकशे शहाऐंशी आणि लोकसंख्या नऊशे चोपन्न आहे अशी माहिती वृत्तान्तात आहे. कोट्स म्हणतात, 'लोणी गावच्या भैरोबा देवाची साप चावलेल्या माणसांना आणि जनावरांना बरे करण्याबद्दल ख्याती आहे. मारुतीचे देऊळ चावडी समोर आहे. त्या पाशी गावसीमा दाखवणारा **'गडधू' गोल दगडी गोटा होता.'सर्जन थॉमस कोट्स साहेब- कै** व्यंकटेश माडगुळकरांनी संदर्भ दिलेल्या सर्जन कोट्स यांचा परिचय सोबत करून देत आहे...

**(आपली वैद्यकीय सेवा चालू ठेवून कोणतेही पारितोषिक किंवा नोकरीमध्ये प्रमोशन मिळणार नसताना, भाषा येत नसताना, लोकांशी संपर्क करायची साधने कमी असताना त्यांना बोलते करून त्यावर रात्री कंदिलाच्या प्रकाशात असा शोध निबंध लिहायला आतून उर्मी असावी लागते. पैसे घेऊन ते काम करता येत नाही, असे मला वाटते. आपल्याला काय वाटते? समाजरचनेचा अभ्यास आवड म्हणून करताना पाहून आजचे डॉक्टर कितपत रस घेतील? अशी विचारणा करावीशी वाटते.)**
सर्जन डॉक्टर कोट्स दुसऱ्या बाजीरावांच्या औषधोपचारासाठी पर्वतीवर जात असावेत. खडकीच्या लढाईच्या धामधुमीनंतर ते दापोडी येथील आर्मीच्या बरॅक मध्ये होते.प्रस्तूत लेखकाला (विंग कमांडर शशिकांत ओकांना) सन १८१८ - १८१९ सालातील ऐतिहासिक लढायांच्या घटनांचा शोध घेताना सर्जन कमांडर कोट्स यांचा संदर्भ कुठे मिळतो का यावर शोधक नजर होती. त्या सर्जन थॉमस कोट्स यांचा तसा संदर्भ शेवटी ग्रॅंट डफ यांच्या 'हिस्टिरी ऑफ मराठाज' ग्रंथातील तिसऱ्या भागात पान ४१९च्या तळटीपेत लागला. डॉ थॉमस कोट्स पेशव्यांना औषधोपचार करत. शिवाय आसपासच्या गावातील जनतेला लस टोचून बरे केल्याने त्यांच्या बद्दल लोकात कृतज्ञता भाव होता. याची बाजीरावांनाही कल्पना होती. ती ही
तळटीप.

† Dr. Coats and Captain Ford, the latter only if he stood neutral, were to be the sole exceptions. Dr. Coats had attended the Peishwa in an illness, had gratuitously performed many cures amongst the people of the country, and had spread vaccination for many miles around ; the anecdote proves that Bajee Rao was not wholly devoid of gratitude.

त्यांचा फोटो, तैलचित्र अद्याप मिळालेले नाही.

खालील एका प्रातिनिधिक चित्रात असेच एक **सर्जन डॉक्टर विल्यम ब्रायडन एकटे काबूलच्या लढाईत हजारोंच्या मृत शिपायातून वाचले होते.** ते जलालाबाद (खैबरखिंडीच्या अफगाणिस्तानाकडील तोंडावरचे) लष्करी तळावर दमलेल्या घोड्यावर मफलर लावून कसेबसे पोहोचले याच्या संदर्भातील हे चित्र आहे.




अशा डॉ. थॉमस कोट्सनी आपले काम चोख सांभाळून हा शोध प्रबंध फावल्या वेळात गावातील लोकांना भेटून माहिती मिळवून तयार केलेला होता. यासाठी बोली मराठी ते इंग्रजी भाषांतरकारची भूमिका कोण करत असावेत असे मनात येते. प्रस्तूत लेखकाने लोणीकंद गावातील सद्य परिस्थिती शोधताना गावातील शाळकरी मुलांनी मदत केल्याचे स्मरते.सर्जन डॉ कोट्स यांच्या निबंधाचा संदर्भ - Transactions of the literary Society of Bombay. Volume. १ ८२३. प्रकरण ८ - पान १८३पासून २८० एकूण ९७ पाने.सर्जन कोट्स यांच्या निबंधाची सुरवात अशी दिसते -

*VIII. *172

## ACCOUNT OF THE PRESENT STATE OF THE TOWNSHIP OF LONY:

IN ILLUSTRATION OF THE INSTITUTIONS, RESOURCES, &c. OF THE MARRATTA CULTIVATORS.

BY THOMAS COATS, ESQ.

[Communicated by the Hon. the PRESIDENT.]

*Read 29th February*, 1820.

THE lands of the township embrace a circumference of nearly nine miles, comprising 3,669 acres, or about $5\frac{3}{4}$ square miles; of which 1,955 acres, or 2,410 beegas of $3,926\frac{2}{3}$ square yards, are arable, and the rest is common, and appropriated as pasturage. The boundary is marked merely by heaps of stones, unploughed ridges, &c., and is not apparent to an indifferent person; but it is well known to the community, and watched with the utmost jealousy. The common land is situated to the WNW. and SW.; generally elevated, rising in some places into hillocks showing the bare rock; in others it is undulating, with hollows opening to the east, which carry off the water in the rainy season; and the whole is more or less thickly strewed with stones, from the weight of a few ounces to as many hundredweights. The soil here is in no place more than a few inches deep, under which is generally a layer of a soft decaying

या निबंधाचा गोषवारा पाहता तो छापील ९७ पृष्ठांचा आहे.त्यात खालील उपशीर्षके आहेत -

**हवामान.** म्हैसूर ७ अंश अक्षांशावरून ते खानदेशाच्या (सातपुडा रांगेच्या) ३० ते ४० मैलाच्या रुंद पट्ट्यात तील इतर हमानाप्रमाणेत लोणी गावचे हवामान असते. मार्च ते मे उन्हाळा जून ते ऑक्टोबर पावसाळा असतो. या भागातील उंच ठिकाणी

भरपूर पाऊस पडतो. बाकी ठिकाणी पाऊस बेताचा पडतो. थंडी फार पडत नाही. समुद्रावरून येणाऱ्या वाऱ्यांमुळे रात्री थंड असतात.

**जमिनीचा पोत** - लोणीच्या भागातील जमिनीचा वरचा काही इंचाचा थर काळ्या मातीचा तर त्या खाली मुरुमाचा थर आहे. त्या खाली काळ्या बेसाल्टचा थर आहे. पावसाळ्यात व हिवाळ्यात त्यावर हिरवे गवत उगवते. भीमानदीच्या बाजूला जमिनीचा उतार होत जातो.

**मोजणी** - गावाचा घेर ९ मैलाचा आहे. ३६६९ एकरात म्हणजे ५¾ चौरस मैल आहे. पैकी १९५५ एकरावर किंवा २४२० बिघा, किंवा ३९२६½ चौरस यार्ड शेती केली जाते.

**शेतसारा वर्षातून ४ वेळा भरावा लागे तो गोळा करायची पद्धत कशी असे?**

मामलेदार जो त्या भागाचा स्थानिक कर गोळा करायचा अधिकारी असे तो आपला एक हत्यार धारी मेसेंजर निरोप्या गाव पाटलांना कुठल्या पिकाला किती पट्टी याची यादी घेऊन भेटे. ती आज्ञा अशी असे - 'ताह मुकादमसूक लोणी तरफ सांडस प्रांत पुणे(अरबी साल)मौजे मकसूर साल मकसूर पैकी तुसार पट्टी बद्दल रुपये २०० गाव हुजूर यांनी या कामास शिपाई पाठवले
आहे
'.

The following is the process usually observed in realizing the revenues :—The Native Collector of the division (Mamlutdar) sends an armed messenger with a written order on the Patail to pay him an instalment of the revenue, mentioning the amount, on account of a specified crop. The order runs as follows :—

" *Tuh Muccadum Sook Lonee Turruf Sandis Praunt Poona* (the Arabic year follows) *Mouzé Muskoor sal Muskoor Peikee Toosar Puttee buddul Rupees* 200 *geoon Hoozur yeneya Kamas Sepoy patweelee ahe.*"

(Signature.)

यावर गावातील येसकर ( गावाच्या वेशीवर पहारा देणारा व निरोप देणारा महार गडी) घराघरात पाठवून दुसऱ्या दिवशी सकाळी चावडीवर येऊन आपापल्या वाट्याचा सारा भरायला तयार राहा अशी यायची दवंडी देत असे. त्याप्रमाणे चावडीच्या कचेरीत शेणाने सारवलेल्या जमिनीवर बसकूर मांडून कुलकर्णी, पाटील व तो निरोप्या शिपाई येऊन बसत. कुळे आपापले सारा एकामागून एक करत भरून त्याची

पावती घेऊन ठेवत असत.(तह- तहसील? मुकादम - मुख्य सूक - ? तरफ - ६० खेडे गावांच्या समूहाचा गट, महाल, मौजे मजकूर- नावाच्या मागे हा शब्द योजून विवक्षितसा उद्देशून, अमुक गाव? साल मजकूर - अमुक
सन?)

*The Patail on this sends the beadle (yeskur) to the house of each cultivator, and summons him to attend at the chowree the following morning, and be prepared to pay his proportion of the instalment of the revenue that is due. The Patail, Koolcurnee, and messenger, accordingly proceed to the chowree, and squat themselves down on a cloth on the cow-dunged floor, and the cultivators all attend in succession. Some at once pay their share, and take a receipt (powtee) from the *260

वरील प्रथा किती सहज सुंदर पणे सांगितली आहे. त्यातून आपल्या शिवाय इतरांना सारा किती द्यावा लागला तेही समजते. पावती मिळते. एक रकमी देता आली नाही तर हप्त्याची सोय पण होती. ती जमलेली रक्कम फोतेदार निरखुन गावच्या ये-वेसकर महाराच्या सोबतीने मामलेदाराला जमा करत असे.दुकानांवर, बलुतेदारांवरील कर कसा असे याचा तपशील -

*Tax on Shops.*

| | Rs. | qr. | a. | Rs. | qr. | a. |
|---|---|---|---|---|---|---|
| Mahadeo, Jain Shopkeeper | 3 | 0 | 0 | | | |
| Boloo, Jain do. | 4 | 0 | 0 | | | |
| Mankoo, Marwadee do. | 4 | 0 | 0 | | | |
| Motee Ram do. | 1 | 0 | 0 | | | |
| | | | | 12 | 0 | 0 |

*Tax on Hereditary Servants of the Township* (Baloota).

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| Carpenter | 2 | 0 | 0 | | | |
| Barber | 1 | 2 | 0 | | | |
| Washerman | 1 | 2 | 0 | | | |
| Silversmith (Treasurer) | 1 | 0 | 0 | | | |
| Shoemaker | 2 | 0 | 0 | | | |
| Ropemaker | 2 | 0 | 0 | | | |
| Gooroo, or Dresser of Idols | 1 | 0 | 0 | | | |
| | | | | 11 | 0 | 0 |
| Tax on the Watchmen's hereditary lands | | | | 15 | 0 | 0 |
| Tax on Grain ; in kind, but commuted for a money payment. | | | | 30 | 0 | 0 |

**कुणब्यांचे जेवणातील पदार्थ, जेवणाच्या वेळा, स्वयंपाक बनवायच्या तऱ्हा...**रोजचे जेवण - १.भाकर, २.भाजी(पाला), ३.अळण, ४.घट्ट (पिठलं) ४. सणावारी - गव्हाच्या पिठाचे घारगे? (इंग्रजीतील वर्णन - cakes made of wheat flour plus raw sugar) ५. तळलेला कडबू? (Tail cher Pulse boiled and mixed with coarse sugar enclosed with wheat paste. ) ६. फोडणी ७. कढी (अमसुलाचे सार) ८. शेवया ९. पापड १० चटणी. दिवसातून २ ते ३ वेळा जेवणात वापरतात)

**जेवणातील पदार्थांचे इतके सुक्ष्म वर्णन एक इंग्रज आपल्या शोध निबंधासाठी करतो याचे आश्चर्य वाटते!)** सकाळी न्याहारी, सुट्टी सोडून ते सकाळी ८ला शेतात जातात. ३ ते ४ तास काम करून मग विहिरीच्या ओढ्याच्या काठाला उकिडवे बसून कालची भाकरी, कांदा आणि चटणीशी खातात. दुपारचे जेवण त्याची बायको २ भाकऱ्या, भाजी, वरण कधी अळण तर कधी आमटी(**Ambtee**) आणते. संध्याकाळी पुन्हा भाकरी, दही किंवा ताक, पापड - तो उडद डाळीचे पीठ, हिंग व काही मसालेदार पदार्थ घालून त्याची पेस्ट करून ती वेफर्स प्रमाणे पातळ लाटून

वाळत घालतात व नंतर जेवणात खातात. शेवटी रात्री ८ नंतर आमटी पुन्हा वाढतात. सणाच्या दिवशी गोड म्हणून शेवयांची खीर,

**मटणाचे जेवण असेल तर त्याचे लहान तुकडे करून ते तेलात तळायला टाकून त्याला हिंग, लसूण कांदा व आणखी काही मसाले घालून किंवा उकडून त्याला फोडणी घालून भाकरी बरोबर तळलेले व नंतर भाताबरोबर ते रसदार करून खातात.** मराठा शेतकऱ्याच्या बायकोला धरून महिन्याचा साधारण खर्च - २ शेर धान्य ८ पै (Seer of ३७ ounces each), परसदारात उगवलेला भाजीपाला २ पै, काही डाळी २, तेल १ पै असा हिशेब केला तर १३ पै (Pice) एकूण ५½ d ( d means old 'penny "denarius') साधारण येईल. त्यात तंबाखूचा खर्च जोडलेला नाही.शेतकऱ्याचा वेष खांद्यावर काळ्या रंगाचे लोकरीचे कांबळे, ६ (Cubit) हात (१ हात म्हणजे साधारण दीड फूट) लांब २ हात रुंद, ते एखादे वर्ष टिकते त्याची किंमत दीड ते २ रुपये, मुंडासं साधारण पांढरे १४ हात लांब १४ इंच रुंद ६ महिने ते टिकते. धोतर १४ हात, असे पुरुषाच्या पोषाखाला दरवर्षी १५ ते साडेपंधरा रुपये लागत. रुमाल किंवा लंगोटी ते वापरतात. कांबळे, धोतर कधी अंथरायला तर काही गुंडाळून न्यायला ही ते सर्रास वापरतात.

**शेती व जनावरांची देखभाल वापरायची हत्यारे -**

The following is an enumeration of the live stock belonging to the township :—

| | | | |
|---|---|---|---|
| Oxen and bulls.............. | 220 | Asses .......................... | 3 |
| Cows.......................... | 156 | Camels ........................ | 1 |
| Buffaloes ..................... | 17 | Goats and sheep ........... | 28 |
| Calves ........................ | 37 | Hogs.......................... | 50 |
| Horses and ponies ......... | 29 | | |

चांगल्या बैल जोडीला ८० ते १०० तर मध्यम जोडीला ४० ते ६० रू. पडतात. एका दिवसात ते १८ ते २० मैल चाल करत, ९० ते १०० किलोचे(?) वजन वाहून नेतात. म्हशी २५ रुपयांपर्यंत मिळतात. दोन्ही वेळा दूध काढणे एक काम असते. १५ ते २० घोडी पाळून अनेकजण पेशव्यांकडे शिपाई बनायची प्रथा सध्या झाली आहे. ३०० पर्यंत घोडे, तट्टू पाळून, शेळ्या मेंढ्या, काही जण व्यवसाय करतात. डुकरे गावात पाळतात ती कोणाच्या मालकीची नसतात. हातचलाखी करणारे कोल्हाटी, डोंबारी दोरीवरची कसरत करणारे, वडारी काम करणारे पाथरवट हे त्या डुकरांना पकडून खातात.

**शेतकऱ्यांची व घरची साधने**

या जमिनीत खोल नांगरट करायची गरज नसते. ऑक्टोबर नंतर रब्बी हंगामात गहू, खपली गहू डाळी पेरतात त्याला कुळवाचा वापर करतात. खरीप हंगामात बाजरी, तूर, मटकी, पीक काढतात पुण्याजवळ ज्वारी लोक खातात. कडब्याच्या १०० पेंड्यांचा तीन राशींना १ ते २ रुपये व नंतर तो दर ४ ते ५ रुपये असा कडाडतो. इतर खालील धान्ये, कडधान्ये पिकवतात - मका किंवा यावनाळ, तूर, मूग, मटकी, हुलगा, पावटा, वाल, चवळी, गवार, घेवडा, कारळे, तीळ, वरीचा तांदूळ, अंबाडी, ताग - मांग लोक याच्या वाखापासून दोर वगैरे बनवतात.**सधन शेतकऱ्याकडे** ६ ते ८ बैल असतात. माजघर ( **Muzghur**), परसदार (**Poorusder**), ओसरी (**woosary**) हे घरातील वेगळे भाग असतात. बाळंतिणीची खोली अंधारी असते. जाते, तांबे पितळेची घागर, पाणी गरम करायला तांब्याचा बंब, किंमत २० रुपये, आणखी काही घागरी पाणी भरून ठेवायला, एक रांजण रोज सकाळी घुवून पुन्हा नव्याने भरून वापरायला ठेवला जातो. पाणी प्यायची काही भांडी, दूध-ताक ठेवायला काही भांडी, चुलीवर जेवण बनवायला गरम करायला, काही मातीची भांडी, आतल्या खोलीत काम झाले की धुवून एकावर एक उलटी करून ठेवतात, तवा (**Iron griddle**), कढई (**frying pan**), पाटा-वरवंटा, बांबूच्या काड्यांनी बनलेली सुपे, लहान मोठ्या दुरड्या, शिप्तरे, घर सफाईसाठी साळूते, लटकवलेली शिंकाळी, दिवा लावायला लटकवून ठेवलेली दोरी, सारवळी, असे साधारण सामान असते. श्रीमंताकडे अशाच तऱ्हेचे सामान पण उंची प्रतीचे, बाजले काथ्या ऐवजी नेवारचे इतपत फरक. ( मात्र मुसळाचे वर्णन त्यात मिळाले नाही)लग्न समारंभ, लहानपणी लग्नानंतर मुलगी वडिलांकडे राही व वयात आली की सासरला जाई. लग्नाचा खर्च मुली कडील करत, अगदी गरीबाच्या मुलीच्या लग्नाचा खर्च मुलाकडून ही केला जाई. क्वचित श्रीमंतात जास्त बायका केल्या जात.लग्न संबंधात १. कुळ व जात २. कुंडली मिलान ३. मुलगी अव्यंग आणि धडधाकट असावी हे पाहिले जाते. लग्न समारंभ २-३ दिवस चाले. मुलगा ४०-५० नातलग मित्रपरिवारासह हळद लावून घोड्यावर बसून मिरवत येई. वधू-वर (उजवीकडे) मंडपात (**arbour**) बसून भटजी संस्कृत श्लोक म्हणून त्यातील काही समजतील असे तर काही गडबडगुंडा करून (**unintelligible**) शेवटी जमलेले अक्षता (**sprincle rice**) टाकून साजरा करत. (अंतरपाटाचे असे वर्णन मात्र त्यात नाही) त्या रात्री मेजवानी असे. दुसऱ्या दिवशी दोन्ही घरातील लोक एकत्र येऊन गप्पागोष्टी, घरगुती खेळ, विनोदी, फाजिल वात्रटपणा सुद्धा (**Not in very delicate language**) करत दिवस साजरा करत. असेच साधारण अन्य जातीत घडत असेबाळंतपण, नंतरचे विधी, १२ महिन्यानंतर जावळ काढतात.

मुलांना घेरा ठेऊन घेरा-शेंडी (**Tuft**), सतीची प्रथा लोणी गावात ४०-५० वर्षांत नव्हती. जयराम श्रीराम म्हणत प्रेतयात्रा काढतात. मुलगा लोटक्यात निखारे घेऊन पुढे असतो. शवाचे कपडे काढून शेण्या व लाकडांची चिता करून अग्नी देतात. नंतर एक जण रात्रभर तिथेच राहातो दुसऱ्या दिवशी राख गोळा करून नदीच्या वाहत्या पात्रात सोडून देतात. अन्य चालीरिती, देव देवतांचे सण, काही कुप्रथा यावर बरेच लेखन केले आहे. भूत, झोटिंग, हडळ वगैरे विस्तार भयास्तव देत नाही.

**बायकांची नावे** गोपी, चिमी, काशी, तुकी, भागी, रडी, अशा सारखी असत तर

**पुरुषांची नावे** रंगोजी, अमृता, बाबाजी, बाळा, लक्ष्मण, चंदू, विठू, पांडू भिमा, नागू नावे प्रचलित आहेत. 'जी आणि बाई' अशी विवाहितांना संबोधन करताना वापरतात.

**घरगुती** संदर्भात बाबा, नाना, बापू तर नानी, ताई अब्बी, काकी असे संबोधतात. जाधव, गायकवाड, पवार, कदम, कट्टी, सांडाजी, शितोळे, मगर ही **आडनावे** इकडे प्रचलित आहेत.

**खेळ मनोरंजन** बाद मेंढी, झप्पा-पाणी? हुतुतू, रंग पंचमी दसरा दिवाळी साजरा करतात.

**लोणी गाव** अक्षांश १८.३७ N रेखांश ७४.८ पुण्यापासून १२ मैलावर. **सरळ रेषेत गेले ७० मैलावर समुद्र लागतो.** समुद्र सपाटीपासून १४७० फूट उंचीवर वसले आहे. ( २०० वर्षांच्या पुर्वीची ही किती माहिती नेमकी आहे? (हीच माहिती विकीपिडियातून अशी दिसते - The wikipedia-Coordinates: १ ८.६२२°N, ७४.0२६°E, area of १ ७२३.२ hectares, population of ७९४४, located in १ ८२0 houses २0१ १ census)गावाच्या प्रथेप्रमाणे पुर्वेच्या वेशीबाहेर महार वस्ती आहे. गावाचा 'टाऊनहॉल' - चावडी ३० फुटाची खोली आहे. त्याला कौलारू छत आहे. काही वाटसरू, सरकारी वार्ताहर, नोकरांना राहायची सोय त्यात करतात. एक पाणी आणणारा कोळी तिथे नोकर असतो. महादेवाचे दगडी बांधकामाचे देऊळ आहे. म्हणतात यशवंतराव शिंद्यांच्या पदरी शिलेदार असताना इथल्या पाटलाने गैरमार्गानी खूप संपत्ती जमवली. नंतर पश्चात्तापाने पापक्षालन म्हणून त्याने हे मंदिर १८ वर्षांपुर्वी बांधले. १६ फूट लांब, १२ फूट रुंद गाभाऱ्यात लिंग आणि शाळुंका आहे. (Silvanka - Emblem of male and female organs) हनुमानाचे मंदिर आहे. एका दगडाला शेंदूर (Cinnabar) फासून साधारण माकडासारखा दिसेल अशी त्याची मूर्ती आत टेकवून ठेवली आहे.

## त्या काळातील लोणीकंद दाखवलेला नकाशा आणि आजच्या काळातला नकाशा

त्या काळातील लोणीकंद दाखवलेला नकाशा आणि आजच्या काळातला नकाशा

LONI KAND




- 

### अचुक शिरगणतीत बारा बलुतेदारांच्या नोंदी -

- 

| | | Number of Houses. | Number of Families. | Males. | Females. | Male Children. | Female Children. | Total Population. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| Tulkarrees, or hereditary cultivators, including the Patails | | 47 | 50 | 55 | 73 | 51 | 38 | 217 |
| Ooprees, or persons cultivating on lease | | 26 | 34 | 54 | 56 | 27 | 25 | 162 |
| Brahmins, including the hereditary Accountant and Priest | | 3 | 3 | 6 | 5 | 3 | 7 | 21 |
| 12 hereditary servants of the Township. | Carpenter (Sutar) | 1 | 1 | 1 | 1 | 2 | ... | 5 |
| | Ironsmith (Lohar), non-resident | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| | Washerman (Pareet) | 1 | 1 | 1 | 2 | ... | ... | 4 |
| | Barber (Navee) | 1 | 1 | 1 | 2 | ... | ... | 4 |
| | Potter (Koombar) | 1 | 1 | 1 | 1 | 2 | 2 | 6 |
| | Silversmith and Treasurer (Sonar. Potedar) | 1 | 1 | 1 | 1 | 1 | 1 | 4 |
| | Dresser of Idols (Goorow) | 1 | 1 | 1 | 1 | 1 | 1 | 4 |
| | Water-carrier (Kolee), lives in the house of a cultivator | ... | 1 | 1 | 1 | 2 | ... | 4 |
| | Shoemaker and worker in leather (Chamar) | 1 | 2 | 3 | 3 | ... | ... | 6 |
| | Ropemaker (Mang), non-resident | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| | Watchman (Mhar) | 13 | 13 | 16 | 16 | 9 | 7 | 48 |
| | Mahomedan Sacrificer | 1 | 1 | 1 | 1 | ... | 1 | 3 |
| Jain shopkeepers (Wanee) | | 2 | 3 | 4 | 8 | 2 | 7 | 21 |
| Marwarree ditto | | 1 | 2 | 2 | ... | ... | ... | 2 |
| Police servants (Ramoossees) | | 3 | 3 | 4 | 3 | 1 | 3 | 11 |
| Mahomedans | | 3 | 4 | 4 | 6 | 4 | 3 | 17 |
| Hired servants | | ... | ... | ... | 11 | ... | ... | ... |
| Slaves | | 1 | 8 | 8 | 7 | ... | 3 | 18 |
| | | 106 | 130 | 164 | 198 | 105 | 98 | 557 |

वरील तक्ता वाचताना मारवाडी २ घरे, जैन वाणी २१ जण म्हणजे ३ ते ४ किराणा दुकाने, रामोशी पोलिसाचे काम करणारे ११, मुसलमान ३, घरात १७ जण, ११ मोलकरणी, ८ पुरुष व ७ बायका गुलाम ही माहिती रंजक वाटते. ५५७ जणांच्या १३० कुटुंबात १६४ पुरुष १९८ बायका तर १०५ मुले ९८ मुली गावात जनसंख्याची शिरगणती त्यांनी कष्टपूर्वक केली आहे. पाटील (Patail) कुलकर्णी (Koolcurnee) पाटलाला शेतसाऱ्याच्या मिळकतीच्या १ /१ २ भाग (एका महिन्याचा पगार मिळतो)

**घरे व आजूबाजूचे वातावरण**या शेतकऱ्यांची घरात वागायची, राहायची पद्धत अत्यंत गचाळ आहे. घरात अंधार असतो. एकाच छपराखाली ते आणि गोठा असतो. घाण व वास यामुळे स्वच्छता नसते. पाणी दुरून आणणे, यामुळे बायकांवर कामाचा ताण असतो. या शिवाय इतर लोक ओंगळ, कमी जेवायला मिळत असलेले वाटतात. कर्ज काढलेले बरेच लोक असतात. ४० ते २०० रुपये, २४ ते ४० टक्के व्याजाने मारवाडी, ब्राह्मण त्यांना देतात. याशिवाय घर सामान, वैरण हे शेजाऱ्याकडून उधार घेतलेले असते. दुसरा बाजीराव सत्तेत आल्यापासून त्याने शेतसारा वसूलीसाठी ठेकेदार नेमले त्यामुळे गरीब रयतेवर प्रचंड ताण पडत आहे. अवर्षण, अती पाऊस, टोळधाडी वगैरेमुळे पीकाची आणेवारी न ठरवता ठेकेदार बळजबरीने वसूली करतात.

**शेतकऱ्याच्या घरातील बायकांचे वर्तन करमणूकीची साधने** -या प्रबंधात पुढे ब्राह्मणांचे राहणीमान, वाण्याच्या दुकानात मिळणाऱ्या जिन्नसांची यादी, रामोशी, मुसलमान, गुलाम यांचे वर्णन केले आहे. गुलाम कर्नाटकातून आलेले असतात. १०० ते ५०० पर्यंत त्यांची किंमत असते. काही काळानंतर त्यांना गुलामीतून मुक्त केले जाते. काही ठिकाणी मुलींना घरच्या पुरुषांच्याशी संबंध ठेवावे लागतात. मिरासदार व वतनदारांची कामे, गावातील रोगराई व औषध पाणी, या विषयावर भाष्य केले आहे.पुरुष साधारण ५’ ४” उंचीचा, वजनाने ५५ ते ६0 किलोचे (७ stone १ १ .३४ lb- एक स्टोन १४ पौंड =६.३५ किलो) , लहान चणीचे असतात. डोळे काळे, डोक्यावर केस बारीक, घेरा-शेंडी, ओठांवर झुपकेदार मिशा असतात. बहुतेकांचा रंग सावळा, क्वचित अगदी काळा असतो. ब्राह्मणांच्या, वाण्यांच्या मुलांसाठी एक शाळा आहे, त्यात लिहायला, वाचायला, अंक गणित शिकवतात. त्यामुळे बहुतेक शेतकऱ्याची मुलांना लिहायला, वाचायचा येत नाही. चोऱ्या झाल्याचे ऐकिवात नाही. साधारण माणसे स्वभावाने गरीब, मनमेळाऊ, कष्ट करत राहाण्याने सहनशील वाटतात. गावात एक जण ९६ तर एक बाई ७२ वर्षांची आहे असे म्हणतात. पण जन्म मृत्यूची नोंद करायची पद्धत नसल्याने नक्की आकडा कळणे शक्य

नाही.

(Signed) T. COATS, Surgeon.

[NOTE.—This account appears to have been compiled from information collected on the spot, and so far as the facts go, it gives a fair picture of an old Dekkan village. The Hon'ble M. Elphinstone's Report on the Territories conquered from the Peishwa (Second edition, pp. 14-33) confirms most of Surgeon Coats' remarks. Loni is on the road to Ahmadnagar. It has a Government vernacular school and a travellers' bungalow. Its present boundaries may be roughly stated to be as follows :—

To the north lie Vadhiva Phulgámva; to the west, Bhávadi and Tuḷápura; to the south, Vághuli and Kesanana; to the east, Bakúri and Peraṇe. Its area is 4211 acres and 11 chains; of this, 911 acres and 18 chains is *máḷa* land or *kharábá*; 418 acres and 11 chains is kept by Government for pasture, roads, &c.; and 2881 acres and 22 chains is culturable.

हा रिपोर्ट वाचून **डॉ. घुर्ये** यांनी एक प्रबंध सन १९५० च्या सुमारास तयार केला होता. यातून पुढे त्यांच्या पुढाकाराने मुंबई विद्यापीठात समाज शास्त्र हा नवा अभ्यासक्रम सुरू करण्यात आला. प्रबंध पुस्तक रूपाने पॉप्युलर बुक डेपोने प्रकाशित केला. त्यात बरेच फोटो आहेत. त्या फोटोंचे संदर्भ घेऊन सध्या तिथे काय दिसते हाही शोधकार्याचा विषय
आहे.



AFTER A CENTURY
AND A QUARTER

LONIKAND THEN AND NOW

G. S. GHURYE
Professor Emeritus of Sociology
University of Bombay



POPULAR BOOK DEPOT
Lamington Road Bombay 7

‘

**लोणी गावाचे त्यावेळचे वर्णन... कोट्ठ लिहितात**, 'गावात प्रवेश केल्यावर एकंदरीत दृष्य पाहताक्षणी चित्त वेधण्यासारखे नाही. जिकडे तिकडे घाण आणि दारिद्य भरलेले दिसते. कुठेही नियमितपणा, नीटनेटकेपणा किंवा संपन्नता दिसत नाही. दुरून जी मातीच्या पडक्या भिंतीसारखी दिसतात, तीच गावकऱ्यांची घरे आहेत. ही घरे पांढऱ्या मातीची, उन्हात वाळवलेल्या विटांनी बांधलेली असतात. मातीची धाबी घरावर आहेत. काही घरे अगदी पडीक असून तेथे कोणी राहत नाही. काही घरांची छपरे गवताने शाकारलेली आहेत. ज्यांना याहून चांगली जागा मिळवण्यासाठी काही साधन नाही, असे दरिद्री लोक व त्यांची गुरे ह्यातून कशीबशी राहतात. गावातील सार्वजनिक इमारत म्हणजे महादेव, हनुमान, भैरव ह्या देवांची देवळे, एक पडझड झालेली मशीद आणि चावडी. गावातील घरे वाटेल तशी बांधलेली दिसतात. त्यात काहीही सुसूत्रता दिसत नाही.घरांच्या मधून अरुंद वाकडे तिकडे आणि गलिच्छ बोळ आहेत. कधी कधी तीन चार घरे एकमेकांना लागून असतात तर कधी दूर दूर

असतात. घरे जशी संरक्षणासाठी बांधलेली दिसतात. आत इतका काळोख आणि उदासीनता दिसते की त्यात राहणारी माणसे माणुसघाणी असावीत असे वाटते... '

**कै. माडगुळकर म्हणतात**, ' शंभर वर्षे जाऊनही गावचे दृष्य, गावाभोवताली असलेली शेत जमीन, महार वतने, लोकांची राहणी, पोषाख, सणसमारंभ. जेवण-खाण. कर्ज-सावकार, शेतीची पद्धती, निकृष्ट गुरेढोरे, वाया जाणारा वेळ हे सर्व जसेच्या तसेच राहिले होते.'**डॉ. घुर्ये यांचा एकशे पंचवीस वर्षांनी बनवलेला वृतांत सांगतो**, ' गावाला आता ग्राम पंचायत झालेली होती. एकोणीसशे अकरा साली डिस्ट्रिट लोकल बोर्डाने शाळा सुरु केली होती. त्यामुळे कोट्टच्या काळी फक्त ब्राह्मण, पाटील आणि वाणी शिक्षण घेत, तेथे सन एकोणीसशे अठ्ठावन्नमधे रोटरी क्लब, मुंबईचे व्यापारी व गावकऱ्यांच्या मदतीने पाच खोल्यांच्या शाळेत नऊशे त्र्याण्णव मुले शिकत होती. 'देवळे तीन ऐवजी सहा झाली होती. बिरोबाचे महात्म्य नाहीसे झाले होते. कोट्ट यांच्या काळात गावात प्रसिद्ध असलेले पिंपरीबुवा हे भूत अजुनही जीवंत होते. दसऱ्याला रेडा बळी देण्याची पद्धत बंद झाली होती.लोकसंख्या वाढली होती. गुलाम आता नव्हते. गावात सायकली आल्या होत्या. चहाची दोन दुकाने, पिठाची गिरणी व हात भट्टीच्या गुत्त्यावर दारू मिळू लागली होती. " ***कै. व्यंकटेश माडगुळकरांच्या या म्हणण्याला मान देऊन***... कोट्टाहेबाने जसे कुठलेतरी एक लोणी गाव घेऊन त्यांचा सांप्रत वृतांत लिहिला, तशी महाराष्ट्रातील दहा-पाच खेडी घेऊन त्यांचा लिहिला पाहिजे. लोकांना भेटून, बोलून, प्रत्यक्ष स्थिती डोळ्यांनी पाहून आजच्या खेड्याचे चित्र रेखाटले पाहिजे....'

**प्रस्तूत लेखक - शशिकांत ओकांनी** कै. माडगुळकरांनी मांडलेल्या विचारांचा मान राखत आधी २००९ साली व नंतर २०१ ४मधे लोणीकंद गावाचे चित्र कसे काय होते याचे वर्णन प्रत्यक्ष भेट देऊन केले त्याचा हा छोटेखानी वृतांत. **आता २००९ मधे** -१ . पुणे ते अहमदनगर चौपदरी महामार्गावरील या गावाजवळच मरावीज बोर्डाचे मोठे केंद्र झाले आहे. आसपास एका शिक्षण संस्थेची मोठी नावाजलेली आंतरराष्टीय दर्जाची शाळा आहे. तेथूनच आळंदीला जाणारा व संभाजी राजांच्या वधाचे स्मारक असलेल्या तुळापुर - वढूला जाणारा रस्ता फुटतो. फुलगावही अध्यात्मिक चाहत्यांचे आवडीचे गाव आहे. त्यामुळे लोणीकंद गावाला जवळच्या वाघोली व कोरेगाव भीमापेक्षा जास्त प्रतिष्ठा प्राप्त आहे.२. गावाची लोकसंख्या आता सहा हजाराच्यावर आहे. उदरनिर्वाहासाठी लोकांचा शेतीवरील भार कमी झाला आहे. कारण आता लोकांना आसपासच्या कारखान्यात आणि वाघोली (सहा किमीवर) येथील पंधरा-सोळा दगडाच्या खाणीत कामे मिळतात. ज्या क्रिस्टल दगडासाठी वाघोली शैल

जगप्रसिद्ध आहे, ती दाभाड्यांची खाण भावडी रस्त्यावर आहे. मात्र ज्यांची अजुनही शेती आहे, ते लोकवान गहू, ज्वारी, तूर, मूग, पालेभाज्या यांची शेती करतात. शेतमाल ट्रकने भरून पुणे व मुंबईच्या पेठेला पाठवला जातो.३. अजुनही गल्ल्याबोळ आहेत पण त्यांना डांबराचे कवच आहे. ड्रेनेजची व्यवस्था असल्याची खूण म्हणून सिमेंटची गोल चेंबरे रस्त्याच्यावर आलेली दिसतात.४. सायकलींचा भाव पडला होता. कमी आवाजाच्या मोटर सायकली तुरळक होत्या पण सिक्स सीटर उर्फ छकडा (वडाप) पुण्याच्या वेशीवरील येरवड्यापर्यंत जाण्यासाठी पीसीएमसी बसेसपेक्षा जास्त लोकप्रिय.५. साठीच्या वरील काही लोक आजही धोतरात दिसतात. पण पँट-शर्ट, टी शर्टात तमाम पब्लिक सर्रास होते. टीव्ही व सिनेमाच्या प्रभावाने मुलींचा पोशाखही साडी न राहता पंजाबी ड्रेस झाल्याने त्यांच्यातील मराठी गावंढळ व लाजरेपणा कमी झाला आहे. मात्र 'बसु विद्याधाम' या मुलामुलींच्या शाळेमधील गणवेशात मुलांना गांधी टोपी सक्तीची असल्याने ती आवर्जून मुलांच्या डोक्यावर असते. प्रत्येकाच्या पायात कमीतकमी स्लीपर
असते.




६. हमरस्त्याजवळ जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा व ग्रामनिधी अंतर्गत महिला अस्मिता भवन, पोलिस स्टेशन व ग्रामपंचायतीची इमारत साधारण २००० सालापासून दिमाखात उभे आहे. कॉलेजसाठी आजही वाघोलीला किंवा पुण्यास जावे लागते.७. हमरस्यावरच २००८ साली जीर्णोद्धार केलेले म्हसोबाचे बिन छपराचे देऊळ (?) तसेच आहे. तेथे पाडव्यानंतर रामनवमीच्या आधी दोन दिवसांचा उरुस भरतो. त्यात कुस्त्यांचा फड लागतो. तमाशाचे कार्यक्रम होतात. सोंगे घेणे बंद पडले आहे. बकऱ्याचा बळी देऊन सांगता होते.८. बलुतेदारांपैकी सुतार, न्हावी, बुरुड, धनगर,

टिकून आहेत. सराफांच्या पेढीत सोनारांना सामावले आहे.चांभार फक्त छत्र्या व चपला दुरुस्तीसाठी उपयोगी पडतो. महार, मांग आदींची घरे आहेत पण नवसमाजरचनेमुळे बलुतेदारांच्या जातींचा उल्लेख टाळला जातो. त्यांचे राहणीमान बदलल्याचे जाणवते. पण काही झोपड्या व पत्र्याच्या चाळ वजा घरात डोकावले तर दारिद्र्याचे दर्शन होते. भैरव, महादेव मंदिरे अजून आपले अस्तित्व टिकवून आहेत. हनुमानाचे मंगलोरी कौलांचे छप्पर असलेले मंदीर चावडी जवळ आहे. तेथेच गाववेशीचा "गडधू" होता. २००४ मधे चावडीच्या नव्या इमारतीच्या बांधकामाच्या धामधूमीत गडधूला तेथून परागंदा व्हावे लागले असावे. तो आता एकांच्या परसदारी असा चुपचाप पडलेला
आहे.



तीच वेळ या खालील दगडी डमरू सदृश्य एका पत्थरावर आली
आहे!



१. गावात नजर टाकता आता काळी मातीची कौले जाऊन मंगलोरी कौलांनी आपले बस्तान बसवले आहे. तर अनेक चुन्या-विटांच्या घरांना बाहेरून सिमेंटचा गिलावा करून रंग लावलेला दिसतो. काही ठिकाणी टीव्हीच्या डिशछत्र्या वाकडी मानकरुन लोणीचे शहरीपण दर्शवतात.२. पिंपरीबुवा भूत स्थान आता "वेताळ बुवा "नावाने बस्तान ठोकून आहे. पण ते आता कोणाला पछाडताना दिसत नाही असे ग्रामस्थांचे म्हणणे पडले.३ विठोबाचे मंदिर अत्यंत क्षीण झाले तरीही तग धरून आहे. वारीच्या वेळी काही पांथस्थ त्याचा आश्रय घेतात असे आसपासच्या रहिवाश्यांनी सांगितले.४. **एक गोष्ट आणखी कळली की लोणी गावी गोराजीच्या काळात टपाल व्यवस्थेचा भाग म्हणून आठ घोड्यांची पागा व तबेला हमरस्त्यावर म्हसोबाच्या देवळाच्या विरुद्ध दिशेला होता. काळाच्या ओघात ते नष्ट झाले.** मशीदही आहे.

पोलिस स्टेशनचे बदलते स्वरूप मागील भागात कार्सची गर्दी










Shree Ramchandra College Of Engineering
Lonikand Pune

15. कोट्व यांच्या उताऱ्यात सन १८२०च्या वेळच्या काही वस्तूंच्या किंमती सांगितल्या आहेत. २००९ च्या सांप्रतकाळी, वस्तुंच्या किंमती आजच्या वाचकांना माहित असतील पण हा लेख नंतरच्या काळात कोणास निदर्शनाला आल्यास त्यांच्या सोईसाठी पुण्याच्या मार्केटयार्डातील बाजारसमितीचे (भावांबद्दल घोळ होऊ नये म्हणून सकाळ मधे छापुन आलेले) घाऊक भाव नोंद करीत आहे. थोड्याफार

फरकाने त्याच किंमती आजच्या लोणीसारख्या खेडेवजा गावाला लागू आहेत असे ग्रामस्थांशी चर्चेत कळले. (आज दि. २६ मे २०१४ मोदींचे सरकार देशाच्या राज्यकारभाराचे सूत्र हाती घेतल्यावर विविध बाजार भाव (सकाळ पेपरात) काय होते याची नोंद करत आहे. नंतर हे भाव मोदींनी निवडणूक प्रचारात दिलेल्या आश्वासनांशी किती जवळीक साधतात याचा ही पडताळा घेता येईल. २००९ सालच्या बाजार भावानंतर २०१४ सालचे बाजार भाव कंसात सादर)

**१६. धान्ये** प्रती रु, किलो/ लिटर- तांदूळ साधा १ ७ ते ३६(३० ते ३५), अंबेमोहोर ४० (५८ते ६०), बासमती १ ८ ते ९० (३३ ते १ ४५), साखर - २८ ते ३२(३१ ), गहू - १ ३ ते १ ८(२० ते ३८), ज्वारी -१ ० ते १ ५(२३ते ३२), गूळ - २६ ते ३०(१ ९ते ३४), डाळी- तूर ७२ ते ८५(५६ ते ६५), मूग - ५८ ते ६२ (९२ते१ ००), मटकी- ५२ ते ५४(७५ ते ७७), हरभरा - ३१  ते ३४(३५ ते ४९). पोहे -१ ७ ते २२(२५ ते ३५), मुरमुरे -भडंग ३६(५६), नारळ ८ ते १ २(९२ ते १ १ ९). तेल (प्रती लिटर) - शेंगदाणा – ७० (१ ०५), सोयाबीन -५२ ते ५६(१ ०८ ते १ १ ८). वनस्पती - ४३ ते४८(९६ ते १ १ ४), खोबरेल -५५ ते ६०(५५ ते ६६). दूध -२४(४२) गाय म्हैस – ३०(४८).

**१ ७. भाजीपाला** – कांदा १ ४(१ ४ते १ ६), - , बटाटा -१ ५(२२), टॉमॅटो -२०(२०), मटार – ६०(८०), मिरची – २०(२२), कोबी – ३०(१ २), फ्लॉवर – ५०(२८) , मेथी - जुडी - ६-८ (१ ४ ते १ ६) , पालक – ६(१ ६), आळू – २(२), शेपू – २(१ ०), कढीपत्ता – १ (२), कोथिंबिर – ८(१ ५), लिंबू - नग – २(२).

**१ ८. फळे** - सफरचंद किलो- १ ०० (१ ५०), संत्रा - ६०-७०(१ २०) , पपई -१ ० (१ ४), चिकू -४०(३०), कलिंगड - ४०-५०(५-१ ०किलो), सिताफळ - ४ , पेरू नग - ५, शहाळे -३-८(२०ते ३०) ,

**१ ९. दूध** लिटरला - गाय २४(४२) , म्हैस – २८(४८). चहा कप -५-७(७-१ ०), कॉफी - ६- ८(१ ०-१ ५) व उपहाराचे पदार्थ (मेनूकार्डावरून)- उपमा - ८ -१ २ (२०), इडलीवडा प्लेट -१ ५ ते २५ (२५ ते ३५), डोसा - २५ -३५(४०- ५०), टोस्ट आमलेट - १ ८ – २५(२०-३०),

**२०. अंडी** प्रती नग -२.२० (३-४), चिकन - जिवंत ५६(९०), ड्रेस्ड् -७३(१ २२),.मटन – २२०(३८०).

**२१ . केबल टीव्ही विभागाप्रमाणे** १ ५० ते ३४० (३४०-४९०) दरमहा, न्यूजपेपर - २-३(४-५), मासिके - २५ ते ४०(३५-५०),

**२२. पेट्रोल-** ५१ (८१ ), डीझेल ४७(६४), चलन रुपयात - डॉलर - ४७.८१ (५९),

पौंड - ७९.५१ (९९), युरो - ६७.८३(८०).

**२३. सोने**-प्रती - दहाग्रॅम रु.१ ४९४0(२८४00). चांदी - रु. २३४५(४१ ७७).

16. लोणीकंद गावाचा रिपोर्ट वेळोवेळी भेट घेऊन चालता ठेवला तर समाज रचनेतील स्थित्यंतरांच्या नोंदी भावी पिढीला आपल्या पूर्वजांच्या राहणीची कल्पना येत राहील..

समाप्त.

**संकलन - विंग कमांडर शशिकांत ओकए ४ - ४०४, गंगा हॅम्लेट सोसायटी, विमाननगर, पुणे ४११०१४.**



